ई-साहित्य प्रकाशन

Netअक्षरी

०१-१२-२००८

अंक : २

नमस्कार मंडळी,

नेटाक्षरीच्या पहिल्या अंकास भरभरुन प्रतिसाद दिल्याबद्दल मनःपूर्वक आभार.

आम्ही तुम्हाला मराठी साहित्याच्या निखळ मनोरंजनाचा वायदा तर केलेला आहेच पण त्याबरोबरच समाजाशी असलेली बांधिलकीही आम्ही विसरलेलो नाही आहोत.

म्हणूनच,

नेटाक्षरीचा हा दूसरा अंक २६ नोव्हेंबर २००८ रोजी मुंबईत रक्तरंजित अतिरेकी हल्ल्यात शहीद झालेल्या पोलिस अधिकाऱ्यांस व मृत्यूमुखी पडलेल्या निष्पाप लोकांना भावपूर्वक अर्पण.



## : : संपादक मंडळ : :

**संपादक -**

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**सहसंपादक -**

सोनाली घाटपांडे ( पुणे )
रेणूका रेपाळ ( अमेरिका )
सुरुची नाईक ( नागपूर )
आनंद माने ( सोलापूर )
नाम गुम जायेगा ( ठाणे )



## ह्या संपादकीय अंकात वाचा..

१.रात्रंदिन आम्हा..युध्दाचा प्रसंग

२. " भ्याड अतिरेक्यांनो " ..
वीरमरण आलेल्या भारतीय पोलिस अधिकाऱ्यांची पुढची पिढी काय म्हणतेय बघा..

३.वाचताक्षणी प्रत्येक भारतीय मनापासून म्हणेल अशी राष्ट्रभाषेतील प्रार्थना
आणि..

४.सलाम मुंबई..एक मुंबईकर व्यक्त करतोय आभार..



**हा अंक फॉरवर्ड करा असं आम्ही म्हणणार नाही..तर..ह्या संवेदना प्रत्येक भारतीयापर्यंत पोहचवा.**
**असे आवाहन करत आहोत.**

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

netaksharee@gmail.com

# रात्रंदिन आम्हा..युध्दाचा प्रसंग

विश्वनिर्मितीपासूनच हे जग अशांत आहे.
ज्वालामुखी आजही सक्रिय आहेत.

भूगर्भातला सक्रिय ज्वालामुखी पृथ्वीची पुर्नचना करतोय तर मानवी मेंदूतला द्वेषाचा ज्वालामुखी मानवजातीचा विध्वंस.
हो.मेंदूतलाच ज्वालामुखी.
कारण, अतिरेक्यांना मनं नसतात.असतात फक्त कारस्थानी मेंदू आणि कारस्थानी मेंदूला पोसणारी सडकी शरीरं.

भारताने कधीही कुठल्या देशावर राज्य करण्याच्या उद्देशाने आक्रमण केलेले नाही.पण,भारतावर मात्र सतत परकीय आक्रमण होत राहिलीत आणि दरवेळेस भारताच्या शूर वीर स्त्री पुरुषांनी प्राणांची बाजी लावून ती परतवून लावली आहेत.
भारत हा लोकशाही असलेला देश.विविध धर्म,भाषा,संस्कृतीने नटलेला.इथला सामान्य माणूस आपल्या बुध्दिमत्तेच्या आणि मेहनतीच्या जोरावर आपले आणि देशाचे जीवन समृध्द करत आलेला आहे.आणि भारताची हीच एकता,प्रगती भारताच्या शत्रूंना खुपतेय.

२६ नोव्हेंबर २००८ ला मुंबईत झालेला अतिरेकी हल्ला हे ह्याचेच ताजे उदाहरण.पूर्वी परकीय आक्रमण देशाच्या सीमेवर व्हायचे.ज्याला भारतीय लष्कर सडेतोड उत्तर द्यायचे.सीमेवरील भारताची अभेद्य सुरक्षा व्यवस्था तोडणे कठीण आहे हे समजल्याने मग हे असे भ्याड अतिरेकी हल्ले त्यांनी सुरु केले आहेत.आपल्या देशात छुप्या मार्गांनी येऊन ते इथलंच खाऊन सुनियोजित कट करुन बॉंबस्फोट,गोळीबार करुन निरपराध माणसांना अत्यंत क्रूरपणे मारतात.

त्यांचा उद्देश जिवीत व वित्तहानी,धार्मिक भावना भडकवणं,सरकारविरोधी असंतोष निर्माण करणं हाच असतो.
कारण,सुजाण नागरिकत्वाची सारी कर्तव्यं पार पाडणाऱ्या,नियमित कर भरणाऱ्या,कायदे पालन करणाऱ्या सामान्य नागरिकांवर असे अतिरेकी हल्ले होणं म्हणजे देशाच्या अंतर्गत सुरक्षा व्यवस्थेवर मोठं प्रश्नचिन्हं.प्रचंड मोठा शस्त्रसाठा,स्फोटकं घेऊन मुंबईसारख्या संवेदनशील शहरात अतिरेक्यांचं दाखल होऊ शकणं ही निश्चितच गंभीर बाब आहे.

सामान्य नागरिकांना वेदनादायक अशी गोष्ट आहे.
सामान्य नागरिक ? की , हा शब्द आता बदलायला हवा ?

हो.आपण सामान्य नागरिक नाहीच.
काळाची पावले ओळखून,आंतरराष्ट्रीय दहशतवादाच्या नव्या चेहऱ्यास सामोरे जाण्यासाठी आपण असामान्य नागरिक बनायला हवं जेणेकरुन कुणीही आपल्यावर घात करुन वार करु शकणार नाही.

सुरक्षा व्यवस्था,गुप्तचर खातं अधिक मजबूत करुन,पोलिसांना अधिक अत्याधुनिक शस्त्र देऊन सरकार आपली जबाबदारी पार पाडेलच.पण, आपणही अधिक जागरुक नागरिक बनूयात.विदेशांत अशा आपत्कालीन परिस्थितीसाठी नागरिकांना खास प्रशिक्षण दिले जाते तसंच आपणही काही मुलभूत गोष्टींचा अवलंब करायला सुरुवात करायला हवी.

संशयास्पद व्यक्ती,कृती,वस्तू यांची माहिती तात्काळ पोलिस यंत्रणेस कळवूया.
आपत्कालीन परिस्थितीत जखमींस मदत,रक्तदान हे परमकर्तव्य मानूयात.
राजकीय नेते व बघ्यांची घटनास्थळावर गर्दी झाल्याने पोलिसी कार्यवाहीत अडथळा येतो म्हणून सुरक्षेचे संकेत पाळूयात.
समाजकंटकांच्या धार्मिक चिथावणीस,अफवांना बळी न पडता भारतीयत्व जपूयात.

**नेटाक्षरीचा हा अंक २६ नोव्हेंबर २००८ रोजी मुंबईत झालेल्या रक्तरंजित अतिरेकी हल्ल्यात शहीद झालेल्या पोलिस अधिकाऱ्यांस ,रेल्वे पोलिसांस, एन एस जी कमांडोज व मृत्यूमुखी पडलेल्या तमाम निष्पाप लोकांना तसेच मनोरा आमदार निवासात घुसलेल्या अतिरेक्यांवर धावून गेल्यामुळे अतिरेक्यांनी गोळ्या घातलेल्या ईमानदार श्वानास भावपूर्ण अर्पण.**



# शहीद




वायरलेसवर संदेश आला
अतिरेक्यांचा हल्ला झाला
हातचा घास ताटात पडला
कर्तव्याचा पुकारा आला

आईने देव पाण्यात बसवले
पत्नीने मन घट्ट केले
लेकराचे चिवचिवणे थांबले
जीव सारे टांगणी लागले

सहकाऱ्यांसवे तो थेट झुंजला
"गनिम टिपला" पण..
दुर्दैवाचा वार झाला
वर्दीत तो शहीद झाला

घरी बातमी गेली
शब्दांचीही वाचा बसली
कुंकूवाची करंडी सांडली
पितृछत्राची माया हरवली

हळहळत लोक बोलले
घराचे ह्या कसे होणार ?

चिमुरडे लेकरु बोलले,
"नको रडू आई..
बाबांचे कार्य पुढे नेणार
मीही,पोलिस अधिकारी होणार.."

अभिमानाने तिचे ऊर भरले
आणि,तिने डोळे पुसले
आणि,
तिने डोळे पुसले..

**- स्वप्ना**

देशासाठी प्राणांची आहुती देणाऱ्या
सर्व जवानांना नेटाक्षरीचा मानाचा मुजरा.
तुमचे बलिदान व्यर्थ जाणार नाही.

# प्रार्थना

हे ईश्वर ,

तेरे बंदो पे रहेम कर
भटक गये है कदम
अंधेरी है डगर
जागृती का सूर्योदय कर
तेरे बंदो पे रहेम कर



उजड ना जाये गुलशन
हर फुल है प्यारा
व्यर्थ ना जाये बलिदान
हर बच्चा है न्यारा
जीत का सूर्योदय कर
हे ईश्वर..



झुके तेरी इबादत में
प्रेम हो अपना धरम
पले तेरी निगाह में
नेक हो अपना करम
अमन का सूर्योदय कर
हे ईश्वर..



अनमोल है जिंदगी
पैसा कागज है "समझ"
इंसानियत है बंदगी
सियासत मे ना उलझ
हिंदोस्ता आबाद कर

हे ईश्वर..प्रार्थना स्वीकार कर, प्रार्थना स्वीकार कर..

**- स्वप्ना**

## सलाम मुंबई..

**मुंबईत झालेल्या ह्या अतिरेकी हल्ल्याच्या प्रसंगी जनतेस ज्यांनी हस्ते परहस्ते मदत केली त्याबद्दल त्यांचे "एक मुंबईकर" या नात्याने आभार व्यक्त करतोय सचिन काकडे.**



- ठिकठिकाणच्या गोळीबार आणि हातबॉंब हल्ल्यांची माहिती,अतिरेक्यांचे वर्णन पोलिसांस कळवून त्या ठिकाणी अनेकांनी दाखवलेल्या धैर्य आणि मदतीबद्दल.
- विखारी नजरांपासून वाचण्याकरता असलेली ओढणी मानवी अवयवांचे तुकडे गोळा करण्याकरता आणि मृतदेहांना झाकण्याकरता पुढे येणाऱ्या अनेकजणींचे.
- मुंबईतील आणि मुंबईबाहेरील अनेकांनी रक्तदान करून रक्त उपलब्ध करून दिल्याबद्दल.
- रक्तदानाला ताटकळत उभे असणाऱ्यांना पिण्याच्या पाण्याची सोय उपलब्ध करून देणाऱ्या शीतपेय कंपन्यांचे.
- जखमींवर अहोरात्र उपचार करणाऱ्या रुग्णालय व डॉक्टरांचे.
- घटनास्थळी अडकलेल्या मुंबईकरांना धीर देऊन आपापल्या घरी सोडायला मदत करणाऱ्या पोलिस व नागरिकांचे.
- जीव धोक्यात घालून अतिरेकी हल्ल्यांचे सलग प्रक्षेपण करून ह्या बातमीस आंतराष्ट्रीय पातळीवर महत्व प्राप्त करून देणाऱ्या पत्रकार व टीव्ही न्यूज चॅनल्सचे.
- शहीद पोलिस निधीसाठी मदत उपलब्ध करून देणाऱ्या सर्वांचे.













**हा अंक फॉरवर्ड करा असं आम्ही म्हणणार नाही..तर..ह्या संवेदना प्रत्येक भारतीयापर्यंत पोहचवा.असे आवाहन करत आहोत.**

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

netaksharee@gmail.com